**वर्धा-यवतमाळ-नांदेड या नवीन रेल्वे मार्गाकरीता रु.२६.०५ कोटी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पुरमा-०६१८/प्र.क्र.१२१/परिवहन-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ फेब्रुवारी, २०१९

**वाचा :** १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-२०१५/प्र.क्र.१९/भाग-१/रेल्वे कक्ष, दिनांक : १४.०७.२०१५
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-११०७/१८६६/प्र.क्र.३३०/परि-५, दिनांक : ०९.०३.२००९
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२१३/परि-५, दिनांक : ३०.०३.२०१३
४) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२१३/परि-५, दिनांक : १९.०३.२०१४
५) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२१३/परि-५, दिनांक : ३१.०३.२०१५
६) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२१३/परि-५, दिनांक : २४.०६.२०१६
७) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२१३/परि-५, दिनांक : ०६.१०.२०१६
८) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२१३/परि-५, दिनांक : १५.०३.२०१७
९) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२१३/परि-५, दिनांक : २२.०३.२०१७
१०) मुख्य अभियंता (बांधकाम), उत्तर मध्य रेल्वे, मुंबई यांचे पत्र क्र. EW/१६६/BA/EBR(P)/२०१८-१९, दिनांक १९.०४.२०१८
११) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-२०१८/प्र.क्र.१४१/परिवहन-५, दिनांक : १०.०८.२०१८.
१२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-२०१८/प्र.क्र.१४१/परिवहन-५, दिनांक : १९.०१.२०१९.

**प्रस्तावना :**

वर्धा-यवतमाळ-नांदेड या नवीन रेल्वेमार्गाकरीता रू.२५०१.०५ कोटी एवढा खर्च अंदाजित असून उक्त खर्चापैकी रू.१०००.४२ कोटी एवढा ४० टक्के हिस्सा राज्य शासनाकडून केंद्रीय रेल्वे बोर्डास उपलब्ध करून देण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. या प्रकल्पाकरिता रेल्वे मंत्रालयाने दिनांक ३१.०३.२०१८ पर्यंत रु.६०३.६७ कोटी रक्कम खर्च केली असून मार्च २०१९ अखेरपर्यंत अजून रु.७९.०० कोटी खर्च करणार आहे. प्रकल्पातील राज्य शासनाच्या ४०% हिश्श्यानुसार या रेल्वे मार्गाकरिता राज्य शासनाने सन २०१७-१८ या वर्ष अखेरपर्यंत रु.२५४.०६ कोटी इतका निधी उपलब्ध करून दिलेला होता. तसेच सन २०१८-१९ या चालू आर्थिक वर्षात संदर्भाधीन दिनांक १०.०८.२०१८ व १९.०१.२०१९ या शासन निर्णयान्वये रु.१७५.०० कोटी

इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पासाठी आणखी रु.२६.०५ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी (Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction) Mumbai CST), मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई-४०० ००१ यांना प्रस्तावनेत नमूद प्रयोजनासाठी रु.२६.०५ कोटी (रुपये सव्वीस कोटी पाच लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास राज्य शासन या निर्णयाव्दारे मंजूरी देत आहे.

२. शासनाने सह सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग यांना "नियंत्रण अधिकारी" व शासनाचे कार्यासन अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित केले असून, या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी येणारा खर्च सन २०१८-१९ या वर्षात मागणी क्र.बी-७, ३००१-भारतीय रेल्वे धोरण निश्चिती संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, (००) ८००-इतर खर्च, (००) (०२) रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (कार्यक्रम) (३००१००५४), ३२-अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४ सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२७३/१४६१,दिनांक २३.०१.२०१९ आणि वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३९/२०१९/व्यय-८, दिनांक ०७.०२.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१३१५३८१४०३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f09466351527 3d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2019.02.13 15:40:32 +05'30'

**( द. ह. कदम )**
अवर सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
२) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली.
३) महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई / दक्षिण मध्य रेल्वे, सिकंदराबाद.
४) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई.
५) मुख्य अभियंता (बांधकाम), उत्तर मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.

८) बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (व्यय-८/बीयुडी-११), मंत्रालय, मुंबई.
१०) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
११) रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कमेचा धनादेश Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction), Mumbai CSMT यांच्या नावाने काढण्यात यावा.
१२) निवड नस्ती, परिवहन-५.

**प्रत, माहिती करिता**

१) मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्रधान सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.